नागपूर मध्यवर्ती कारागृह
विद्युत पुरवठ्यात सुधारणा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-इएलआय-०१२०/१(१८)/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- २० जून, २०००

पहा:- कारागृह उपमहानिरीक्षक,(मुख्यालय) महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक-बीएलडी/३३९९/कक्ष-३ पुणे दिनांक २४.१२.९९.

**शासन निर्णय :-**

नागपूर मध्यवर्ती कारागृहात बंद्यांची संख्या क्षमतेपेक्षा वाढलेली असल्यामुळे तेथे विद्युत पुरवठा खंडीत झाल्यास अनुचित घटना होऊ नये म्हणून जनरेटर बसविणे आवश्यक असल्यामुळे व तेथील मुद्रणालयासाठी नवीन ट्रान्सफॉर्मर बसविणे आवश्यक असल्यामुळे आणि काही वायरिंग करणे आवश्यक असल्यामुळे तसेच सदरहू बाब न्यायप्रविष्ट असल्यामुळे या सर्व कामासाठी विद्युत पुरवठ्यात सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

उपरोक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, उपरोक्त विद्युत पुरवठ्यात सुधारणा करण्याच्या कामाबाबतच्या येणाऱ्या एकूण रु.१,०९,११,५००/- (रुपये एक कोटी नऊ लक्ष अकरा हजार पाचशे फक्त)एवढया खर्चाच्या प्रस्तावास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे.

(१) सदरहू बांधकामाच्या प्रस्तावास प्रथम सचिव समितीची मान्यता घेण्यांत यावी.

(२) यासाठी येणारा खर्च २०००-२००१ या वार्षिक योजनेच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यांत यावा.

(३) केंद्र शासनाचा ५० टक्के हिस्सा उपलब्ध करुन दिल्यानंतरच राज्य शासनाचा ५० टक्के हिस्सा वितरीत करावा.

(४) मुख्य अभियंत्यांकडून अंदाजपत्रके प्रमाणित करुन घेण्यात यावीत.

उपरोक्त खर्च "२०५६-तुरुंग-०१०१ तुरुंग-१०१ (एक) मध्यवर्ती तुरुंग कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा.

हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग,नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ अनुक्रमे क्रमांक-११/युओआर/इमा-२,दिनांक १७.१.२०००, क्रमांक- ११९/का.१४७५ दिनांक १०.४.२००० आणि क्रमांक-सीआर-४०८/२०००/व्यय-८, दिनांक २०.५.२००० अन्वये देण्यांत आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यांत येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( गु.ज.कुळकर्णी )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.

..२.

..२.

निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
कोषागार अधिकारी, पुणे.
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा. २) कार्यासन
नियोजन विभाग (का-१४५५) कार्यासन
वित्त विभाग (व्यय-८ कार्यासन)
गृह विभाग, पोयुडी-१.
निवडनस्ती.